**शासकीय कर्मचाऱ्यांकडून शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबाबाबत आणि कर्तव्ये पालनातील कसूरीबाबत शिस्तभंग कारवाई करण्याबाबत.**

**तरतूदींची अंमलबजावणीबाबत आढावा.**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक: शाकाप-१००९/प्र.क्र.१५/०९/१८ (र.व का.)**

**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**

दिनांक : **24 MAY 2011**

**संदर्भ :- १) शाकाप-१००९/प्र.क्र.१५/०९/१८ (र.व का.), दिनांक २० जुन, २००९ चे पत्र.**
**२) समक्रमांकाची दिनांक २८ जुलै, २००९, १६ डिसेंबर, २००९, ४ मार्च, २०१० आणि २३ नोव्हेंबर, २०१० ची पत्रे.**

## परिपत्रक

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ हा दिनांक २५ मे, २००६ च्या अधिसूचनेन्वये दिनांक १ जुलै, २००६ पासून राज्यात लागू झाला आहे. सदरहू अधिनियमातील प्रकरण तीन मधील कलम ८ ते १२ अन्वये प्रत्येक शासकीय कर्मचारी त्याला नेमून दिलेली किंवा त्याच्याशी संबंधित असलेली शासकीय कर्तव्ये किंवा शासकीय काम अत्यंत दक्षतेने आणि शक्य तितक्या शिघ्रतेने पार पाडण्यासाठी कायदेशीररित्या बांधील आहे.

सदरहू अधिनियमाच्या कलम १० च्या पोटकलम (२) व (३) अन्वये शासकीय काम पार पाडण्यासाठी जाणूनबूजून किंवा हेतूपुरस्सर विलंब लावणाऱ्या किंवा दुर्लक्ष करणाऱ्या शासकीय अधिकारी/कर्मचारी यांच्याविरुध्द कारवाई करणे बंधनकारक आहे. सदरहू तरतूदींची अंमलबजावणी, अधिनियमाचा मुळ उद्देश साध्य होण्याच्या दृष्टीने कितपत होत आहे, याचा आढावा घेण्याचे शासनाचे आदेश आहेत. यास्तव सर्व विभागाकडून व सर्व कार्यालयांकडून अशा कसूरी करणाऱ्या किती अधिकारी / कर्मचाऱ्यांविरुध्द कारवाई झाली आहे, याबाबतची तपशीलवार माहिति अत्यंत तातडीने व उशिरात उशिरा दिनांक २० मे, २०११ पर्यंत सामान्य प्रशासन विभाग (रचना व कार्यपध्दती) कडे पाठवावी.

सदरहू परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक 201105311543540001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( रत्नाकर गायकवाड )**
**मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**१) अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव**
**२) सर्व मंत्रालयीन विभाग.**